" CIPET यांना औद्योगिक प्रशिक्षण संस्था,
चंद्रपूर येथे कौशल्य विकास प्रशिक्षण योजना
राबविण्याकरीता परवानगी देणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मंजूरी-३६१३/२०१६/९९/प्र. क्र. १०७/व्यशि-२,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२,
दिनांक : २१ डिसेंबर, २०१६

वाचा:- १) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक :२०/सीटीएस/ CIPET/२०१६/४८०, दिनांक २३.८.२०१६.

२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, समक्रमांकित दिनांक ३०.०८.२०१६ चा शासन निर्णय.

३) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर यांचे पत्र क्रमांक का.२/ प्रशिक्षण/CIPET/ २०१६/३४६, दिनांक ८.१२.२०१६.

प्रस्तावना :-

"सेंट्रल इन्स्टीट्युट ऑफ प्लाटेक्नॉलॉजी इंजिनिअरिंग अँड टेक्नॉलॉजी CIPET" ही संस्था भारत सरकारच्या रसायन आणि फर्टिलायझर मंत्रालयाची मान्यता असलेली संस्था असून त्यांची महाराष्ट्र राज्यात औरंगाबाद येथे कौशल्य विकास प्रशिक्षण देणे याबाबतचे प्रशिक्षण केंद्र आहे. त्याच धर्तीवर सदर संस्थेला चंद्रपूर येथे प्रशिक्षण कौशल्य विकास प्रशिक्षण केंद्र स्थापित करावयाचे आहे. सदर प्रशिक्षण केंद्रामध्ये एस. सी./एस.टी./ओ.बि.सी./अल्पसंख्यांक इत्यादी प्रर्वगातील उमेदवारांना प्रशिक्षित करुन रोजगार उपलब्ध करुन देणार आहेत. याकरीता सदर संस्थेला दोन वर्षाकरीता औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर या संस्थेतील जागेवर शेड बांधण्याची मागणी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भिय (१) येथील पत्रान्वये शासनाकडे केली होती. त्याअनुषंगाने शासनाच्या संदर्भाधिन (२) येथील शासन निर्णयान्वये "सेंट्रल इन्स्टीट्युट ऑफ प्लाटेक्नॉलॉजी इंजिनिअरिंग अँड टेक्नॉलॉजी CIPET" यांना कौशल्य विकास प्रशिक्षण योजना राबविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपुर येथील जागेमध्ये दोन वर्षाचा सामंजस्य करार करुन तात्पुरती शेड बांधण्यास काही अटींच्या अधिन राहून परवानगी देण्यास शासनाची मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, "सेंट्रल इन्स्टीट्युट ऑफ प्लाटेक्नॉलॉजी इंजिनिअरिंग अँड टेक्नॉलॉजी CIPET" या संस्थेची शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपुर या संस्थेतील सेंटर ऑफ एक्सलन्सचे शेड उपलब्ध करुन देण्यांची मागणी असल्याने या संदर्भात सहाय्यक संचालक (तां), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यांत आली होती. सदर समितीने सादर केलेला त्यांचा अहवाल प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपुर येथील सेंटर ऑफ एक्सलन्स (सी.ओ.ई.) च्या इमारतीतील काही भाग दोन वर्षांच्या कालावधीकरीता तात्पुरत्या स्वरुपात देण्यांची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णयः-**

"सेंट्रल इन्स्टीट्युट ऑफ प्लाटेक्नॉलॉजी इंजिनिअरिंग अँड टेक्नॉलॉजी CIPET" या संस्थेस कौशल्य विकास प्रशिक्षण योजना राबविण्यासाठी शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपुर येथील ५९४.४० चौ.मी. इतकी जागा दोन वर्षांच्या कालावधीकरीता तात्पुरत्या स्वरुपात सामंजस्य करार करुन काही अटींच्या अधिन राहून देण्यांस शासनाची मंजूरी देण्यांत येत आहे. सदर जागेचा तपशिल पुढील प्रमाणे आहे.

| अ. क्र. | सध्या अस्तित्वात असलेले व्यवसाय/कक्ष/वर्गखोली | जागेचे क्षेत्रफळ (चौ. मी.) | उपलब्ध करुन द्यावयाच्या जागेचे अंदाजित क्षेत्रफळ (चौ. मी.) |
|---|---|---|---|
| १ | कर्मशाळा क्र. २ मधील व्यवसाय {बेसीक शीट मेटल/ बेसीक टर्निंग व ग्राईंडींग/बेसीक मिलींग व गिअर कटींग (अर्धा भाग)/ॲडव्हान्स वेल्डींग/ॲडव्हान्स पीएलसी/ॲडव्हान्स बेसीक सीएलसी (अर्धा भाग) | १६.७५ x २४.९० | ४१७.०८ |
| २ | COE विभागाचा पहिला मजला AVA वर्गखोली/ECS वर्गखोली/स्वच्छतागृह | १) १६.१२ x ५ = ८०.६०<br>२) १६.१२ x ६ = ९६.७२ | १७७.३२ |
| | | एकुण क्षेत्रफळ | १) ५९४.४० चौ. मी.<br>२) ६३८९.८० चौ.फु. |

**अटीः-**

१) **औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपुर या संस्थेतील कर्मशाळा क्रमांक २ मध्ये व COE विभागातील कार्यरत व्यवसाय व त्यामध्ये असलेली यंत्रसामुग्री व फर्निचर इतरत्र सुस्थितीत हलविण्यासाठी तसेच पार्टीशन काढणे इत्यादी कामासाठी येणारा खर्च CIPET या संस्थेमार्फत करण्यांत यावा.**

२) **सदर संस्थेमार्फत सुरु करावयाचे प्रस्तावित अभ्यासक्रमासाठी ३ फेज विद्युतची आवश्यकता असून, तसा विद्युत प्रवाह दिल्यानंतर विद्युतदराची आकारणी सदर संस्थेमार्फत नियमित देण्यांत यावी.**

३) "सेंट्रल इन्स्टीट्युट ऑफ प्लाटेक्नॉलॉजी इंजिनिअरिंग अँड टेक्नॉलॉजी CIPET" या संस्थेस सदर जागा फक्त दोन वर्षाच्या कालावधीसाठी सामंजस्य करार करुन तात्पुतरच्या स्वरुपात देण्यांत यावी.

४) COE इमारतीमागील मोकळी जागा CIPET या संस्थेस वापरण्याची मुभा राहील.

५) सदर जागेची मालकी ही शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर यांचीच राहील.

६) संस्थेसोबत करण्यात येणा-या दोन वर्षाच्या कराराच्या प्रारुपास शासनाची पूर्व मान्यता घेणे बंधनकारक राहील.

७) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर येथे सध्या सुरु असलेल्या व्यवसायावर कोणताही विपरीत परिणाम होणार नाही, याची दक्षता व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने घ्यावी.

८) **शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर या संस्थेतील यंत्रसामुग्री किंवा फर्निचर हलविल्यामुळे संलग्निकरणावर कोणताही परिणाम होणार नाही, याची दक्षता प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर यांची राहील.**

**वरील अटी व्यतिरिक्त ज्या बाबी / बदल संस्थेकडून कार्यवाही करणे अपेक्षित आहे, त्याचा समावेश सामंजस्य करारामध्ये करण्यांची जबाबदारी प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर,जिल्हा चंद्रपूर यांची राहील.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२११६५९२१८९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Ramesh Namdeo Gite

Digitally signed by Ramesh Namdeo Gite
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d393321776e432301afbfdc4e901e3512aed52531219062a4a99ea7bd3ff104, cn=Ramesh Namdeo Gite
Date: 2016.12.21 17:18:12 +05'30'

(र. ना. गिते)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई -१
२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर.
३) मा. मंत्री (कौ. वि. व उ.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (कौ. वि. व उ.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. प्रधान सचिव, (कौ. वि. व उ.) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) उप सचिव (व्यशि) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, चंद्रपूर
८) प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर
९) निवड निस्ती (व्यशि -२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई

**प्रतिलिपी, माहितीस्तव सादर,**

१) मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे सचिव, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा. सभापती, विधानपरिषद यांचे सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई